पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित
अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२२-२३
मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने
भारित (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील
व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.३७/पापु-२३**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २३ मार्च, २०२३

**वाचा :-**

१. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२१/प्र.क्र.५/सेवा-६, दि. ३०.१२.२०२१
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ८.२.२०२३
३. महालेखाकार कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः एम.एच.८३३६/२९२, दि. १५.२.२०२३
४. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्रमांकःमजीप्रा/भनिनि/वित्त-१/भनिनि व्याज/सु.अं.प्र.१३ /२०२२-२३, दि. १७.२.२०२३

**प्रस्तावना :-**

सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी पोटी प्राधिकरणाकडून प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधीक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते. शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९१२६८ अंतर्गत प्राधिकरणास व्याज देण्यात येते.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीपोटी शासनाकडे दिनांक ३१.३.२०२२ अखेर रु.३४४,४५,५३,९४४/- इतकी रक्कम जमा असल्याचे महालेखाकार

कार्यालयाने संदर्भाधीन दिनांक १५.२.२०२३ च्या पत्रान्वये कळविले असून त्यानुषंगाने व्याजाची रक्कम वितरीत करण्याची विनंती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधीन दिनांक १७.२.२०२३ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुषंगाने जमा रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या प्रचलित व्याज दराने व्याजाची रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे प्राधिकरणाला वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

आर्थिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक " वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९१२६८) " या लेखाशिर्षाखाली प्राधिकरणाला रुपये २४,४५,६३,३३०/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी पंचेचाळीस लाख त्रेसष्ट हजार तीनशे तीस फक्त ) इतकी व्याजाची रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून होणारा खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक " वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) " या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी हा "८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी " या शिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा करण्यात यावा.

४. वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९६/२०२३/ व्यय-३, दिनांक ०२.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३ /अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२३१४४७३४५८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.03.23 17:01:38 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थसंकल्प-१८)
११.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२.निवड नस्ती कार्यासन पापु-२३